संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांच्या अधिनस्त कार्यालयात प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी-१७१८/प्र.क्र.७४/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १३ जून, २०१८

**शासन आदेश**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत करावयाची कार्यपध्दती सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/१४, दिनांक ३१.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मंत्रालयीन विभागातील खालील कर्मचाऱ्यांच्या सेवा संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांना खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोरील पदावर व कार्यालयात प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव व पदनाम | सध्याचा विभाग | प्रतिनियुक्तीचे पद व वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.रो.ना.राऊत,<br>सहायक कक्ष अधिकारी | जलसंपदा विभाग | कार्यालयीन अधिक्षक, वर्ग-३<br>(९३००-३४८००, ग्रेड पे ४२००) |
| २. | श्री.यो.दि.लुटे,<br>सहायक कक्ष अधिकारी | नगर विकास विभाग | वसतीगृह तथा आवार व्यवस्थापक, वर्ग-३<br>(९३००-३४८००, ग्रेड पे ४२००) |

२. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांच्या अधिनस्त श्री.रो.ना.राऊत, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग यांच्या सेवा प्रथम: **दोन वर्षाच्या** कालावधीसाठी तर श्री.यो.दि.लुटे, सहायक कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग यांच्या सेवा **एक वर्षासाठी** खालील अटींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे:-

(अ) ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/१२, दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुदी विचारात घेऊन जलसंपदा विभाग व नगर विकास विभाग यांनी सामान्य प्रशासन विभाग/का-१२अ यांच्याशी सल्लामसलत करुन प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती ठरवाव्यात.

४. श्री.रो.ना.राऊत, सहायक कक्ष अधिकारी, व श्री. यो.दि.लुटे, सहायक कक्ष अधिकारी, यांच्या प्रशासकीय बाबी, अनुक्रमे जलसंपदा विभाग व नगर विकास विभाग यांचे मार्फत हाताळण्यात येतील.

५. श्री.रो.ना.राऊत, सहायक कक्ष अधिकारी व श्री. यो.दि.लुटे, सहायक कक्ष अधिकारी यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी अनुक्रमे जलसंपदा विभाग व नगर विकास विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३११५७३५७१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.06.13 11:59:51 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**संबंधित कर्मचारी (विभागामार्फत)**

**प्रत,**

१. अ.मु.स./प्र.स./सचिव जलसंपदा विभाग/नगर विकास विभाग/सामान्य प्रशासन विभाग/ अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ } संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत

२ सह/उप सचिव (आस्थापना), महसूल व वन विभाग/संसदीय कार्य विभाग/ सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन १२-अ, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

३. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धमपेठ, नागपूर-४४००१०

४ उप सचिव (का-१२अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने त्वरेने उपलब्ध होतील याबाबत त्यांनी संबंधित विभागाकडे पाठपुरावा करावा

५ साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ).